**<u>एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता आर्थिक</u>**
**वर्ष सन २०१९-२० साठी यशदा, पुणे या संस्थेस**
**<u>अनुदान वितरित करण्याबाबत ( दुसरा हफ्ता)</u>**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. टिआरएन-०७१९/प्र.क्र.१०/सीपीटीपी-अ**
मंत्रालय, मुंबई
दि. २०/११/२०१९

<u>वाचा</u> :-१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि.०१/०४/२०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक-टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४ /१३/१२-अ/१८-ब, दि.०८/०८/२०१४
३) यशदा, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.२४१/बजेट२०२१/सीपीटीपी प्रशासन, दि.०४/११/२०१९
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. बीयुडी-०७१९/प्र.क्र.१०/सीपीटीपी-अ, दि. ०९/०७/२०१९
५)वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८/०७/२०१९

**<u>प्रस्तावना :-</u>**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. २०/०१/२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्ती हाणाऱ्या गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यासाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येत आहे. त्यानुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण -४ या तुकडीचे पुनर्विलोकन /उजळणी प्रशिक्षण दि. १७/०६/२०१९ ते दि.३०/०६/२०१९ या कालावधीत आयोजित करण्यात आले होते. सदर प्रशिक्षणासाठी संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये रु. ३३,३२,०००/- (रुपये तेहतीस लाख बत्तीस हजार फक्त) इतके अनुदान यशदा, पुणे या संस्थेला वितरित करण्यात आले आहे.

उपरोक्त संदर्भ क्र. ५ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदींपैकी प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर,२०१९ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांवरील खर्च याबाबतचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत वितरित करण्यास मान्यता देण्यात आली असून आता वेतनेतरसाठी एकूण मंजूर अनुदानाच्या ६० टक्केच्या मर्यादेत रु. २,९४,८४,०००/-इतके अनुदान अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) उपलब्ध करुन दिले आहे. त्यापैकी दि. ०९/०७/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. ३३,३२,०००/-इतके अनुदान यशदा, पुणे या संस्थेस वितरित करण्यात आले असल्याने आता रु.**२,६१,५२,०००/-** इतके अनुदान सीपीटीपी-५ व ६ च्या प्रशिक्षणाकरिता यशदा, पुणे या संस्थेस वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**<u>शासन निर्णय :-</u>**

२. विचारांती, सदर शासन निर्णयान्वये यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या प्रशिक्षण संस्थेस **लेखाशीर्ष-ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३ प्रशिक्षण (००)(१२) यशदा, पुणे या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७० ०८७१)** या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात सीपीटीपी-**५** व **६** च्या प्रशिक्षणासाठी **रु. २,६१,५२,००० (रुपये दोन कोटी एकसष्ठ लाख बावण्ण हजार फक्त)** इतका निधी वितरित करण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) पुणे या संस्थेने प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकीच रक्कम कोषागारातून आहरित करण्याची दक्षता घ्यावी.

आ) सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

इ) सन २०१९-२० या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई) वितरित करण्यात आलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र यशदा, पुणे या संस्थेने महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर व शासनाला सादर करावे.

उ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे यांनी उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर यांना राहतील.

ऊ) वित्त विभागाच्या दि. ०८/०७/२०१९ च्या शासन निर्णयातील नमूद अटी / शर्तीचे पालन करून सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी यांनी संस्थेस वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाची रक्कम **रु.२,६१,५२,००० (रुपये दोन कोटी एकसष्ठ लाख बावण्ण हजार फक्त)** आहरित करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०१९११२०१०५२१९८७०७** असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, ou=GENERAL ADMINISTRATION DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2019.11.20 12:24:02 +05'30'

( वि. रा. ठाकूर )
**उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
४. लेखाधिकारी, यशदा, पुणे (३ जादा प्रतीसह)
५. सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई
६. जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
७. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मुंबई-३२
९. निवडनस्ती